## संपादकीय-

कविता म्हणजे दबलेल्या मनाचा हुंकार. जिवाची घुसमट जेव्हा असह्य होते, वेदनांना व्यक्त व्हायला साधन उरत नाही , तेव्हा कविता जन्म घेते.  ही कविता कवी आपल्या डायरीत लपवूनच ठेवतो, एखाद्या दागिन्याप्रमाणे. हा दागिना त्याला तर अमूल्यच असतो. पण जगाला त्याची किंमत कळेल न कळेल ही भिती त्याला सतावते. त्याच्या कवितेची टिंगल व्हावी हे त्याला खपत नाही . त्यामुळे त्याचा कल ती कविता स्वतःपुरतीच ठेवण्याकडे असतो. पण जेव्हा त्याची वेदना त्याची एकट्याची न रहाता सार्वजनिक असते , तेव्हा, त्याची कविता देखिल व्यक्तिगत न रहाता सार्वजनिक बनते. ती कोणाच्या तरी नजरेस पडते. कोणीतरी प्रसिद्ध करतो. जगातल्या समदुःखी जीवांना ती आपली वाटते. मग ती कविता लोकांची 'दुखती रग' बनते, जनसामान्यांच्या वेदनेचा हुंकार बनते. न दबणारा आवाज बनते.

आज आम्ही अशा काही कविता सादर करतोय ज्या तुम्हाला आपल्या वाटतील. अगदी आपल्याच दुःखाचा आवाज, आपल्याच वेदनेचा शब्द.

**आपलीच कविता ..!**

यजमान संपादक –

**नाम गुम जायेगा ( ठाणे )**

सहसंपादक

**सोनाली घाटपांडे ( पुणे )**

**स्वप्ना कोल्हे  ( नाशिक )**

**अहं ब्रह्मास्मि  ( पुणे )**

**आनंद माने (सोलापूर)**

**सुरुचि नाईक ( नागपूर )**

**सचिन काकडे (मुंबई )**

**रेणूका रेपाळ (अमेरिका)**



## वही...

अनेकदा पाहिलंय तुला, उगाच पानं चाळताना
विरून गेलेल्या शब्दांची सांगड पुन्हा घालताना

पानावरची शाई उडून गेली तरीही, शब्द मागे रेंगाळतात
का, कोण जाणे ? जुन्या आठवणींना तेच उजाळा देतात

चार शब्दही पुरेसे असतात, आठवणीत शिरण्यासाठी
प्रयत्न मात्र फ़ोल ठरतात, त्यांना दूर सारण्यासाठी

तू बंद केलेले मनाचे कप्पे ... उघडून टाकतोस
अधाशासारखे आठवणींचे घोट पिऊ लागतोस

तुला खुप आवडतं त्या गोड आठवणीत रमायला
थोड्या वेळासाठी तरी .. दुःखाशी नातं तोडायला

आयुष्यात सुखाचे क्षण पुन्हा जगता यावेत..
म्हणूनच मनासोबत वहीतही ते जपून ठेवावेत

- पुजा कोरगावकर



## साठीतला भारत

पाहता पाहता बापू
भारत साठीत आलाय
अनेक जखमा
अंगावर मिरवत
भारत साठीत आलाय

तुम्हाला सांगतो बापू
मी रोज भारत बघतो
रस्त्याच्या कडेला
विरलेल्या कपड्यातून
घामाच्या लाल धारा
भविष्यावर शिंपडताना
कधी कधी भारत
संघटीत कामगार होतो

आणि स्वाक्ष-या करतो
कंपनीच्या जाचक एग्रीमेंटवर
तो असतो त्यांच्या
हक्काच्या संघर्षाला
अखेरचा लाल सलाम

कधी असतो भारत तरूण
खुलेपणाच्या धोरणानं
आणलेल्या सुखासीनतेवर
आधाशासारखे ताव मारणारा
त्यांना कधीच नसते चिंता
सुखासीनतेच्या शेवटाची

कधी कधी हाच भारत
'इंडिया' होऊन वावरतो
दलाल स्ट्रीटवर
बेधुंद होऊन नाचतो
सेन्सेक्स च्या तालावर
'आपली इकॉनॉमी आता
किती स्ट्रॉंग झालीय'
याचीच गणितं असतात
त्यांच्या तोंडी
दहाबारा टक्क्यांकडं
एकवटलेल्या संपत्तीवर
सांगीतली जाते
भारताची श्रीमंती

तुम्ही पाहिलं होतं ना बापू
एकोप्यानं नांदणा-या
समाजाचं स्वप्न
पहा त्याच्या कशा
उडाल्यात ठिक-या
मजबूत झाल्यात
जातीच्या भिंती
कधीच न पडण्यासाठी
आणि त्यांच्या आस-यानं
उभी आहेत
राजकारणाची दुकानं

साठीतला भारत आता
निपचीत पडलाय म्हणत
वाट पाहतोय
येईल पुन्हा एकदा
बापू नावाचा डॉक्टर
भारतातला भारत
जगवण्यासाठी
'इंडिया' ला भारत करण्यासाठी

- श्रीपाद कुलकर्णी



## नव्यानं उसळायचंय !

लिहायचंय खुप लिहायचंय,
मनातलं चव्हाट्यावर आणायचंय,
मोकळं मोकळं व्हायचंय,
नव्यानं उसळायचंय

तडफ़ड असतेच मनाची ,
अगदी तशीच जशी फ़डफ़ड वातीची
सभोवताली वारा जरी असह्य
तरी तगमग प्रकाशण्याची

मनाचंही अस्संच काही
वाटलं तरी बोलायचं नाही,
टोचलं तरी पाणी आणायचं नाही
स्वतः जळायचं पण जाळायचं नाही।।

असतेच मनःस्थिती ही अनेकांची
नाही काही वेगळे तुजपाशी
नको रेंगाळू या गुंत्याभोवती,
ऊठ , नाहीतर निघून जाईल रे संधी।।

**प्रणव मराठे**
**(मुंबई)**



मान घालुनी खाली मी ही वाट चालतो आहे
येणाऱ्या जाणाऱ्यांच्या थुंकीस झेलतॉ आहे

मी माणुस नाही आहे , मज नसे हदय ना छाती
वाऱ्यावरती उडणारी मी कुण्या काळची माती
जगण्याच्या डबक्यामध्ये आजन्म लोळतो आहे
येणाऱ्या जाणाऱ्यांच्या थुंकीस झेलतॉ आहे

मजला कोठे विचार माझे मांडायाचे होते
कुठे दोस्त हो ! तुमच्याशी मज भांडायाचे होते
मलाच मी पुन्हा पुन्हा या शिव्या घालतो आहे
येणाऱ्या जाणाऱ्यांच्या थुंकीस झेलतॉ आहे

का भांडण मिटवायाचे का सोडवायचा गुंता
ओढच नाही तेथे का मग तुटावयाची चिंता
अवघडलेल्या प्रश्नांना मी असे टाळतो आहे
येणाऱ्या जाणाऱ्यांच्या थुंकीस झेलतॉ आहे

कुठे कविता मी लिहितो, मी कधी मारवा गातो
गर्दीत सुरांच्या इथल्या मी निःशब्द वावरुन जातो
मी पुन्हा बोलणे नाही - इतुकेच बोलतो आहे
येणाऱ्या जाणाऱ्यांच्या थुंकीस झेलतॉ आहे

**---शतानंद पाटिल**
**(मुंबई)**



## घर गळतंय माझं

घर गळतंय माझं
तसं ते नेहमीच गळतं
पण पावसाळा आला की
उडतात छतावरच्या
दोन-चार काड्या
अन पाऊस येतो
आत जरा जोराचा

घर गळतंय माझं
थेंबांचं शहर झालय
पाण्यानं तुंबलय
वाट पाहते निचरा होण्याची
छताला भोक आहेच
पण जमीनीला ही करते
निचरेल... आपोआप

घर गळतंय माझं
दोन हातांनी
मी छत सांभाळतेय
पण त्याचाही कंटाळा आलाय
आकाशाला चिटकवून
ठेवायचा प्रयत्न चाललाय

घर गळतंय माझं
वसंताच्या सकाळी
ग्रीष्माच्या दुपारी
पावसाच्या रात्रीही
पौर्णिमेच्या चांदण्यांनी
अमावासेच्या अंधारानी

घर गळतंय माझं
तुझ्या हसण्याने
तुझ्या रागाने
तुझ्या हळवेपणाने
तिरस्काराने
तुझ्या जाण्याने

घर गळतंय माझं
घर गळतंय माझं

**-अबोली**
**( अनुप्रीता शिरोडकर )**



## पाचोळ्यातला पाऊस

पाऊस आला आणि भिजले
मनातले ते सुके कोपरे
तेच ते मग जुनेच प्रश्न
अंकुर होउनी ठाकले...

त्याच झऱ्याच्या त्याच किनारी
पाषाणाने मान टाकली
कोसळल्या मग त्याच धारा
रडता रडता खोली वाढली ...

तोच गारवा नि तीच हिरवळ
पण मन मात्र शांत का ???
पालवीच्या बहरण्याला
आज माझाच आक्षेप का ???

गारठलेल्या त्या जड थेंबांना
ओठ तुझे तव सावरी ...
आज त्यांच्या रात्र ढगांना
ही धराही अपुरी ...

किंचित थोडे सावराया
प्रश्नच जेव्हा धावले...
प्रेमाच्या त्या असह्य पुरात
नावा होऊन वाहिले ...

“चल ना जाऊ त्याच पुरात
ही धरा नाही आपुली ...
दोघेही मग रुजून येऊ
पाषाणाच्या अंतरी...”

नकोच मज हा पाऊस आता
अन झऱ्यातिल पाचोळा
तोच तो मग हरेक वर्षी
साठवणींचा पावसाळा ... आठवणींतील पावसाळा

**संदीप उभळकर**
**(मुंबई)**



## वाळूचे घर

शेणाचे ना मेणाचे होते
माझे घर वाळूचे होते

कावळा हि मज जैसा बूद्धू
पण चिमणीला डोके होते
माझे घर वाळूचे होते

रंगीत सुंदर शिंपले
अन छतावरती तारे होते
माझे घर वाळूचे होते

सुखाला सीमा नव्हती
ना दुःखाचे वारे होते
माझे घर वाळूचे होते

शांत शांत त्या समुद्र किनारी
घरात हसरे गाणे होते
माझे घर वाळूचे होते
अजस्त्र लाट ती घेऊन गेली
जे जे मज समीप होते
माझे घर वाळूचे होते
माझे घर वाळूचे होते

**- प्रियांका**



## दंगलीनंतर तो भेटला

दंगली नंतर तो भेटला...
दिसतंय का तुला ?
काय रे ?
दिसतंय का?
हे भळाभळा वाहणारं रक्त
काय किंमत आहे त्याची
का स्वस्त झालंय
पाण्यापेक्षाही ?

म्हणूनच तू रक्त जाळायला
केरोसिन आणि पेट्रोल वापरतोयस
दिसतंय ना।
आपल्याच हातांनी
स्वतःच स्वतःचा खून पाडतोयस
ते तरी दिसतंय का ?

चाकू सुरे , दगड विटा
जे मिळेल ते घेऊन तू रक्तच वहावायला निघालास
सांडलेलं रक्त परत भरायची
किमया आहे का तुझ्यात ?
नाही ना ?
मग कशासाठी करतोयस हे ?
गुलाम आहेस का कुणाचा ?
तुला नादावणारे आहेत का कुणी ?
...
असतीलच
नाहीतर तुझ्या गांडीत तेवढा दमच नाहीये !

रुपेश गांधी



## आस तुझी

राब राब राबतोय दीसान दीस
कधी मिळणार मला याचं फ़ळ
कसरत करतोय देऊनी
आतड्याला कळ ... !!

राबणं तर माझ्या नशिबीच
पर राबुनच मरायचं
राबूनी जीव कासाविस झालाय
तरी बी हा गाडा असाच ... !

ह्या देण्यानं तर येडलंय मला
येडलंय या बॅंकवाल्यांनी
बोचक्याभर ओझं वावलंय
वावलय ह्या सावकारांनी ...!

वाळतंय माजं पीक म्हणूनी
ह्या मेघराजाची वाट बगतोय
देवाकडे वाळणा या पीकाला
जगवाया पाणी मागतोय ...!

तुझ्यावरच जलम आमचा
दया कर बाबा बरस येकदा
तुझ्यावरच आशा आमची
थंड कर या भुमीला येकदा...!

तुझ्यासाठी आतुरलाय जीव माझा
कधी करशील थंड या धरतीला
तुझ्याकडे टक लागलीया माझी
कधी फ़ोडशील ह्या काळया ढगाला... !

**- आनंद राजगोळे**



## ताई घर मला नाही

त्या दुपारी
तिथे उभी ती
सांगत होती दुर्दैवी आई
"ताई घर मला नाही"

"जेव्हा चालले सप्तपदी
माहेर सोडले , सोबत पती
त्या वळणाची आता मजला
वाटही आठवत नाही
ताई घर मला नाही

"सासरी आले, येथे रमले
चार सुखाचे दीस काढले
परि फ़ार सुखाचे दिवस
माझ्या नशिबातच नाही
ताई घर मला नाही

बांगड्या फ़ुटल्या, नशीबही फ़ुटले
या घराशी नाते तुटले
ह्या घराशी संबंध संपला
सांगू लागल्या आई
ताई घर मला नाही

शेत थोडे वाट्याला आले
झोपडीत माझ्या , तेथे राहिले
दोन पोरां इथे वाढवले
परि त्यांस किंमत नाही
ताई घर मला नाही

पोरे शिकली मोठी झाली
सारी माझी माया लुटली
मम कष्टांच्या दारी सुद्धा
मला घेत नाही
ताई घर मला नाही...

येथे टाकले, मी ह्या घर म्हटले
घर नाही हे आश्रम आहे
सांगून गेल्या बाई
ताई घर मला नाही...

**जान्हवी गोळे**
**(पुणे)**



# my बोलीतील काही corporate ओव्या

( तुमच्या पुढ्यात फ़िरते जाते
नसले तरी कंप्युटर वर फ़िरणारी
एखाद्या प्रोजेक्टची cd नक्कीच
असेल )

नाही दळण कांडण
नाही दाणा ना कणिस
कौर्पोरेटी भरडतो
एकमेकाले माणूस

मंदी मधि बिगडला
जमाखर्चाचा ratio
ख़िशामाजी मोबाईल
कॉल कराया pco

आला मार्च गेला मार्च
संगे आले रिसेशन
नाही मिळाला बोनस
अन नाही प्रमोशन

चाळूगिरी चाटुगिरी
विश्वासघात दम
corporatee म्हणतात
ह्याले प्रोफ़ेशनॅलिजम

तत्वं निष्टां morality
ह्याचे सजले टेबल
सेल लागला लागला
price negotiable

माह्या बॊंसाची pro
कशी दिसे tiptop
कधी होई desktop
कधी होई laptop

माह्या बॉस चे बोंसाले
जो जो लावितो custurd
त्याले मिलते रेटींग
i'll kill that bast...

अजूनही खुप काही
होते मल्हे लिहायाचे
शब्द सेन्सार जाहले
आता ऒठ शिवायाचे

**- समीर सामंत**



रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी‘ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्याव्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करून वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फ़ॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतू असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू . मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहोचवण्याचा आमचा संकल्प सिद्धीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

netaksharee@gmail.com